**कृषी विभागाद्वारे राबविण्यात येणाऱ्या विविध केंद्र व राज्य योजनांतर्गत अनुदानावर वाटप करावयाच्या कृषी औजारासंदर्भात थेट लाभ हस्तांतरण (DBT) योजना राबविण्या बाबत.**

**शासन निर्णय**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- सुकृऔ-२०१६/प्र.क्र.३०१/११- अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक:- २१ जानेवारी, २०१७

<u>वाचा</u>:- शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र.डीसीटी २३१६/प्र.क्र. १३३/का-१४१७, दिनांक: - ५/१२/२०१६.

<u>प्रस्तावना</u>:-

केंद्र व राज्य शासनाद्वारे राबविण्यात येणाऱ्या विविध कल्याणकारी योजनांतर्गत लाभार्थींना देण्यात येणारे अनुदान वस्तुस्वरुपात न देता सदर अनुदान लाभार्थ्यांना थेट लाभ हस्तांतरण (DBT) पध्दतीने देण्यात यावे असा धोरणात्मक निर्णय राज्य शासनाने नियोजन विभागाच्या दिनांक ५/१२/२०१६ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. नियोजन विभागाच्या सदर शासन निर्णयाच्या अनुषंगाने कृषी विभागाद्वारे राबविण्यात येणाऱ्या केंद्र व राज्य पुरस्कृत विविध योजनांतर्गत अनुदानावर वाटप करण्यात येणाऱ्या कृषी औजारांच्या (कृषी औजारे, पीक सरंक्षण औजारे, विद्युत/डिजेल/पेट्रो डिजेल/बोअरवेल/सबमर्सिबल पंपसंच व एचडीपीई पाईप) संदर्भात थेट लाभ हस्तांतरण पध्दती राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर प्रकरणी शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

<u>शासन निर्णय</u>:-

कृषी विभागाद्वारे राबविण्यात येणाऱ्या विविध केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत अनुदानावर वाटप करण्यात येणाऱ्या कृषी औजारांच्या संदर्भात आता खालील प्रमाणे कार्यपध्दती अवलंबविण्यात येईल.

<u>१. अधिसूचना</u>:-

कृषी विभागामार्फत थेट लाभ हस्तांतरण योजनेसंदर्भात आधार अधिनियम चे कलम ७ व आधार (इनरोलमेंट अँड अपडेट) नियमन २०१६ च्या नियम १२ प्रमाणे अधिसूचना काढण्यात येईल.

<u>२. लाभार्थी निवडीचे निकष</u>:-

ज्या योजनेंतर्गत कृषी औजारांचा, अनुदानावर पुरवठा करावयाचा असेल त्या योजनेच्या मार्गदर्शक तत्वाप्रमाणे लाभार्थी निवडीचे निकष लागू राहतील.

<u>३. अर्जदाराची ओळख</u>:-

अर्जदाराची ओळख पटविण्याकरिता, तसेच तो खरोखर शेतकरी आहे, तसेच त्याने दिलेला बँक खाते क्रमांक बरोबर आहे हे निश्चित करण्याकरिता लाभार्थी शेतकऱ्याने खालील प्रमाणे कागदपत्राची स्वयंसाक्षांकित प्रत देणे आवश्यक राहील.

अ) शेतकऱ्यांच्या स्वत:चे नावे शेत क्षेत्राचा ७/१२ व ८- अ हे दाखले.

आ) लाभार्थी अनुसूचित जाती/जमाती या प्रवर्गातील असल्यास त्याबाबत प्राधिकृत अधिकाऱ्यांनी दिलेल्या वैध जात प्रमाणपत्राची प्रत.

इ) आधार प्रमाणपत्राची प्रत.

ई) अर्जदार शेतकऱ्याने त्याचे बँकेचे खाते आधार क्रमाकांशी जोडून घेणे आवश्यक राहील आणि त्याकरिता त्यांनी बँकेला दिलेल्या पत्राची बँकेकडून मिळालेली पोहोच पावती प्रत.

**४. योजनेंतर्गत अनुदानावर पुरवठा करावयाच्या कृषी औजारांची यादी व तांत्रिक निकष ठरविणे**:-

अ) योजनेंतर्गत अनुदानावर पुरवठा करावयाच्या कृषी औजारांची यादी व तांत्रिक निकष (Technical Specification) क्षेत्रिय अधिकाऱ्यांच्या व यापूर्वी याबाबत गठीत तांत्रिक समितीच्या सल्ल्याने व क्षेत्रिय चाचणीच्या आधारे आयुक्त कृषी यांनी निश्चित करावयाचे आहेत.

आ) ज्या कृषी औजारांच्या बाबतीत तांत्रिक निकष (Technical Specification) Bearau of Indian Standard (BIS) यांनी ठरवून दिलेले आहेत, त्याचे बाबतीत BIS प्रमाणे पूर्ण Technical Specification नमूद करणे बंधनकारक राहील.

इ) देशांतर्गत निर्मित BIS प्रमाणिकरण नसलेल्या कृषी औजारांचा या यादीत शक्यतो समावेश करण्यात येऊ नये. परंतु, काही अपरिहार्य परिस्थितीत जर BIS प्रमाणिकरण नसलेल्या देशांतर्गत निर्मित कृषी औजारांचा समावेश आवश्यक ठरल्यास त्या औजारांच्या उत्पादकांनी त्यांच्या औजारांचे प्रमाणिकरण केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या संस्थाकडून करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच, प्रमाणिकरण करणाऱ्या अशा संस्थेने संबंधित प्रमाणिकरण डिझाईनला BIS निकषाप्रमाणे / त्या संस्थेने विहित केलेल्या पध्दतीप्रमाणे प्रमाणिकरण अनुक्रमांक देणे बंधनकारक राहील, जेणेकरून औजार कोणत्या प्रमाणकाप्रमाणे निर्मिती करण्यात आली याची माहिती लाभार्थी शेतकऱ्यांना होवू शकेल.

ई) आयातीत कृषी औजारे ही Global Technical Standards प्रमाणे त्या प्रमाणपत्रासहच आयातीत करण्यात आली असावीत आणि त्यांची प्रमाणकासह यादी आयुक्त कृषी यांनी प्रसिध्द करावी.

उ) प्रस्तुत योजनेत समाविष्ट करतांना ज्या कृषी औजारांच्या उत्पादकांनी प्रत्येक कृषी औजाराच्या दृष्य भागावर कंपनीचे नाव/ब्रँड नाव व प्रमाणिकरण संस्थेने दिलेला प्रमाणिकरणाचा अनुक्रमांक छापला असेल अशाच कृषी औजाराचा समावेश आयुक्त कृषी यांनी करणे बंधनकारक राहील.

५. **योजनेंतर्गत अनुदानावर पुरवठा करावयाच्या कृषी औजारांचे मानक मूल्य (Cost Norms) ठरविणे.**

कृषी औजारांचे उत्पादक / पुरवठादारांनी त्यांच्या कृषी औजाराच्या Technical Specification चा तपशील व औजाराबाबत विक्रेत्यांकडील अद्ययावत दरपत्रक सादर करणे बंधनकारक राहील. या आधारे व बाजारातील सर्वेक्षणाद्वारे आयुक्त कृषी यांनी योजनेंतर्गत पुरवठा करावयाच्या कृषी औजाराचे मानक मूल्य (Cost Norm) प्रस्तावित करावेत. म्हणजे त्याच्या आधारे अनुदानाच्या रकमेची परिगणना करण्यात येईल. मानक मूल्य रक्कमेस शासनाची मान्यता मिळाल्यावर ते मानक मूल्य कृषी औजारांचे मानक मूल्य (Cost Norm) म्हणून ग्राहय धरावे. समान Technical Specification असलेल्या कृषी औजाराचे मानक मूल्य (Cost Norm) एकासारखे निश्चित करण्यात यावे.

६. **<u>थेट लाभ हस्तांतरण पध्दतीने हस्तांतरण</u>**

अ) थेट लाभ हस्तांतरण पध्दती हस्तांतरण करण्याकरिता लाभार्थ्यांनी त्यांना मंजूर करण्यात आलेल्या कृषी औजारांच्या मान्यता प्राप्त Technical Specification पेक्षा कमी नसलेल्या Technical Specification ची कृषी औजारे उत्पादक कपंनीच्या कोणत्याही अधिकृत विक्रेत्याकडून विकत घेण्याची मुभा राहील. उदा. पिक संरक्षण औजारांच्या बाबतीत टाकीची क्षमता जास्त असू शकेल, ट्रॅक्टरचा हॉर्सपॉवर जास्त असणे व एक्सेसरीजचा समावेश असणे अनुज्ञेय राहील, परंतु, त्याकरिता शासनाने निश्चित केलेल्या मानक मूल्याच्या आधारे परिगणित अनुज्ञेय अनुदानापेक्षा अतिरिक्त अनुदान देय ठरणार नाही.

आ) लाभार्थी शेतकऱ्यांनी कृषी औजारांची खरेदी कॅशलेस पध्दतीने त्यांच्या आधारक्रमांकाशी निगडीत स्वत:च्या बँक खात्यातून विक्रेत्याला कृषी औजारांच्या किंमतीची अदायगी करणे आवश्यक आहे. म्हणजेच **NEFT, RTGS, IMPS** इ. Electronic Fund Transfer किंवा धनादेशाव्दारे किंमत अदायगी करणे आवश्यक आहे.

इ) लाभार्थी शेतकऱ्यांनी वरील प्रमाणे कृषी औजारांची खरेदी केल्यानंतर देयकांची प्रत विक्रेत्याकडून दोन प्रतीत घ्यावी व त्यापैकी एका देयकाची स्वयंसाक्षांकीत प्रत पंचायत समिती/तालुका कृषी आधिकारी किंवा प्राधिकृत जनसुविधा केंद्र (Common Service Centre ) यांच्याकडे सादर करावी यावेळी त्यांची ओळख संगणकावर Bio Metric पध्दतीने नोंदविण्यात येईल. देयकासह अन्य कोणतेही कागदपत्र सादर करण्याची सूचना लाभार्थ्यांना दिली गेली असल्यास त्याची प्रतही सादर करणे आवश्यक राहील. (उदा. टँकरबाबत नोंदणी पत्र इ.)

ई) शासनाने सूचना दिल्यास काही देयकांची विक्रीकर विभागाकडून सत्यता पडताळणी/ तपासणी करुन घेण्यात येईल जेणे करुन खोटया देयकाच्या आधारे अनुदानाची रक्कम मिळविण्यावर नियंत्रण करणे शक्य होईल .

उ) वरील प्रमाणे कार्यवाही झाल्यानंतर अनुदानाची संपूर्ण रक्कम शेतकऱ्याच्या खात्यावर थेट लाभ हस्तांतरण पध्दतीद्वारे पंधरा दिवसाच्या आत जमा करणे संबंधितावर सेवा हमी कायदयान्वये बंधनकारक करण्यात येईल व तत्संबधीची अधिसूचना शासनस्तरावरुन काढण्यात येईल.

ऊ) लाभार्थी स्वत: विक्रेत्याकडून औजारांची खरेदी करणार असल्याने औजारांच्या गुणवत्तेसंदर्भात शासनाची कोणतीही जबाबदारी असणार नाही.

ए) योजनेची योग्य अंमलबजावणी होण्याकरिता आयुक्त कृषी यांनी BIS प्रमाणिकरण आणि केंद्र शासनाच्या मान्यता प्राप्त संस्थेने दिलेले कृषी अवजाराचे प्रमाणिकरण क्रमांक तसेच आयातीत उपकरणे व अवजाराचे जागतिक तांत्रिक प्रमाणिकरण क्रमांक (Global Technical Specification) यांची अद्ययावत माहिती कृषी विभागाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन दयावी.

ऐ) शेतकऱ्यांना खुल्या बाजारातून कृषि औजारे खरेदी करण्याबरोबरच महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ किंवा शासनाच्या इतर महामंडळाच्या विक्री केंद्राकडूनही वरील कार्यपध्दती अवलंबून कृषि औजारे खरेदी करण्याची मुभा राहील.

ओ) वर्ष २०१७ -१८ पासून कृषि औजारांची वरीलप्रमाणे खरेदी करणे आर्थिक दृष्टिने दुर्बल शेतकऱ्यांना सोयिस्कर व्हावे याकरीता जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांनी जिल्हयाचे पत आराखडयामध्ये योग्य ते उद्दीष्ट व आर्थिक तरतूदीचा समावेश करावा.

औ ) आर्थिक वर्ष २०१७-१८ पासून (दिनांक ०१.०४.२०१७ ) वरील प्रमाणे योजनेची पूर्णत: अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

अं ) माहे जानेवारी २०१७ ते ३१ मार्च २०१७ पर्यंत लाभार्थीनी वरील (इ) प्रमाणे कृषि औजारे देयकाची स्वयंसाक्षांकित प्रत व औजारे मंजूर करतांना विहित करण्यात आलेल्या अन्य कागदपत्रांच्या प्रती सादर करताना लाभार्थी शेतकऱ्यांची ओळख BioMetric पध्दतीने नोंदविण्याची व्यवस्था उपलब्ध नसल्यास अशा प्रकरणात शेती औजारांचे Physical verification करुन घ्यावे.

अ:) माहे जानेवारी २०१७ ते मार्च २०१७ पर्यंत आर्थिकदृष्टया दुर्बल शेतकऱ्यांना शेती औजाराच्या पूर्ण किंमतीची अदायगी करणेकरीता बँक कर्ज उपलब्ध होण्यास अडचण येण्याची शक्यता लक्षात घेता, ज्या शेतकऱ्यांना त्यांना मंजूर शेती औजाराची पूर्ण किंमत भरुन औजारे खुल्या बाजारातून खरेदी करणे शक्य नसल्यास त्यांनी महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळाच्या विक्री कार्यालयाकडून औजारांची फक्त लाभार्थी हिश्याची रक्कम भरुन वरील प्रमाणे कृषि औजारे विकत घेण्याची मुभा राहील. अशा प्रकरणी लाभार्थी शेतकऱ्यांना देय अनुदानाची रक्कम महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ यांना अदा करण्यात येईल. परंतु याबाबतचा निर्णय घेण्याचे स्वातंत्र्य लाभार्थी शेतकऱ्यांना राहील.

प्रस्तुत धोरणानुसार कार्यवाही करण्याकरिता पूर्व तयारीसाठी लागणारा आवश्यक व अपेक्षित वेळ लक्षात घेता दिनांक ३१/३/२०१७ पर्यत सध्याच्या दर करारातील दर आणि BIS द्वारे विहित गुणवत्ता निकषांची पुर्तता करणाऱ्या उत्पादनांचा समावेश करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२३१११०१६०१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sharad Balkrishna Pawaskar

Digitally signed by Sharad Balkrishna Pawaskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sharad Balkrishna Pawaskar
Date: 2017.01.23 11:12:47 +05'30'

**(श.बा.पावसकर)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) अप्पर मुख्य सचिव (नियोजन विभाग) मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) कुलगुरु, कृषि विद्यापीठे (सर्व)
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, मुंबई -२५
६) कृषि संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) कृषि संचालक, (सर्व) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

८) विभागीय  कृषि सहसंचालक (सर्व)
९) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१०) कृषि विकास अधिकारी (सर्व जिल्हा परिषद)
११) महालेखापाल-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई
१२) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई
१३) महालेखापाल -२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र नागपूर
१४) महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र नागपूर
१५) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१६) निवडनस्ती ( कार्यासन ११-अे )